महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम सन २०१६-१७ या योजनेंतर्गत दिलेल्या जाहिरातींच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तंमुगा-०११७/प्र.क्र.०५/पोल-१५**
मंत्रालय, मुंबई- ४०० ००३२
**दिनांक : १५ मार्च, २०१७.**

**वाचा :** १) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांकः तंमुगा-१००८/प्रक्र-४७/२००८/पोल-१५, दि.१४.०८.२००८.
२) क्र.पोमसं/४०/९०६९/मगांतंमुगा/वृत्तपत्र-जाहिरात/३४/२०१५, दि. ३०.१२.२०१६.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५

**प्रस्तावना :**

उपरोक्त शासन निर्णय क्र.१ मधील तरतूदीनुसार महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिमेची जाहिरात दरवर्षी दूरदर्शन, आकाशवाणी तसेच राज्यातील "ब" व "क" वर्गवारीतील वृत्तपत्रामधून प्रसारित करण्यात येत आहे. सदर मोहिमेच्या सन २०१५-१६ या वर्षाच्या मोहिमेची ४०० चौ. सें. मी. आकाराची कृष्ण-धवल जाहिरात पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी मुंबईतील "ब" व "क" वर्गवारीतील वृत्तपत्रातून दिनांक २९ एप्रिल, २०१६ व दिनांक ३० एप्रिल, २०१६ रोजी माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांचे मार्फत प्रसारित केली होती. त्यासंबंधीची एकूण **३२ वृत्तपत्रांची देयके** या विभागास प्राप्त झाली असून त्याची यादी विवरणपत्र “अ” मध्ये सोबत जोडली आहे. या बाबीवर रुपये १,३५,६००/- (रुपये एक लाख पस्तीस हजार सहाशे फक्त) एवढा खर्च आला असून त्या खर्चास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१५-१६ या वर्षाच्या मोहिमेची जाहिरात दिनांक २९ एप्रिल, २०१६ व दिनांक ३० एप्रिल, २०१६ रोजी वृत्तपत्रामधून प्रसिध्द करण्यासाठी आलेल्या रुपये १,३५,६००/- (रुपये एक लाख पस्तीस हजार सहाशे फक्त) एवढ्या खर्चास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च यापूर्वी अदा करण्यात आलेला नाही.

३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर ३२ वृत्तपत्राच्या देयकांच्या रुपये १,३५,६००/- (रुपये एक लाख पस्तीस हजार सहाशे फक्त) इतक्या रकमेचे धनादेश तयार करुन संबंधितांना त्यांचे वितरण करावे. सदरचा खर्च महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहिमेची प्रसिध्दी व प्रचार यावरच विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावा.

४. या बाबीवर होणारा खर्च रुपये १,३५,६००/- (रुपये एक लाख पस्तीस हजार सहाशे फक्त) मागणी क्रमांक बी-१, "प्रधान लेखाशीर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गांव मोहिम (२०५५ ०५३३) २६-जाहिरात व प्रसिध्दी" याखाली दर्शवून सन २०१६-१७ या वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र.३ मधील शासन निर्णयाच्या अनुक्रमणीकेतील अ.क्र.३८ मधील, परिशिष्टामधील अ.क्र.८ मधील नियम १७ अन्वये आणि सदर शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या प्रत्येक मार्गदर्शन तत्वाचे पालन करुन तसेच प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३१५१६३६४६३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hussein Alimiya Mukadam

Digitally signed by Hussein Alimiya Mukadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Hussein Alimiya Mukadam
Date: 2017.03.16 17:30:05 +05'30'

**( हु. अ. मुकादम )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई. (मूळ ३२ देयकांसह)
२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
४. महालेखापाल (लेखा व अनुदेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र शासन, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (३ प्रती)
६. निवासी लेखा व परीक्षा अधिकारी, मुंबई
७. वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव, अर्थसंकल्प (१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवड नस्ती (पोल-१५).